अल्पसंख्यांक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींकरिता वसतीगृह बांधण्याकरिता निधी उपलब्ध करण्याबाबत.

शासकीय विज्ञान संस्था, औरंगाबाद

महाराष्ट्र शासन

अल्पसंख्याक विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः वसगृ -२०१४/प्र.क्र. ७२/का.८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : १२ फेब्रुवारी, २०१५

वाचा --

१) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्यांक विकास विभाग क्र. मौआम-२००९/प्र.क्र.१५/का.८, दि.०२.०३.२०१०

२) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्यांक विकास विभाग क्र. अविवि-२००९/प्र.क्र.१५(३)/का.८, दि.२७.०३.२०१०

३) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्यांक विकास विभाग क्र. अविवि-२००९/प्र.क्र.१५/का.८, दि.३०.०३.२०१०

४) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्यांक विकास विभाग क्र. अविवि-२०११/प्र.क्र.४८/का.८, दि.२८.०२.२०१२

५) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्यांक विकास विभाग क्र. वसगृ-२०१४/प्र.क्र.७२/का.८, दि.१६.०६.२०१४

प्रस्तावना -

राज्यातील सर्व जिल्हयांमध्ये अल्पसंख्यांक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनीसाठी वसतीगृहे बांधण्याबाबतचा शासन निर्णय, दिनांक २ मार्च, २०१० रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णय अन्वये शासकीय विज्ञान संस्था, औरंगाबाद येथे अल्पसंख्यांक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींच्या वसतीगृहाच्या बांधकामासाठी रु.४,९८,४७,७७३/- (रुपये चार कोटी अठ्ठयाण्णव लाख सत्तेचाळीस हजार सातशे त्र्याहत्तर फक्त) इतक्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संचालक, शासकीय विज्ञान संस्था, औरंगाबाद यांना दि.३०.३.२०१० व दि.१६.६.२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये अनुक्रमे रु. १.०० कोटी व रु.२.०० कोटी अशी एकूण रु.३.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र कार्यकारी अभियंता, जागतिक बँक प्रकल्प विभाग, औरंगाबाद यांनी सादर केले असून जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांनी त्यांच्या दि. २०.०८.२०१४ रोजीच्या पत्रान्वये उर्वरित निधी रुपये १.९८ कोटी वितरीत करण्याची विनंती केली आहे. जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांना सदर निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

शासकीय विज्ञान संस्था, लेणी रोड, औरंगाबाद येथील अल्पसंख्यांक समाजातील मुलींकरिता वसतीगृहाच्या बांधकामासाठी जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांना रु. १,९८,४७,०००/- (रुपये एक कोटी अठ्ठयाण्णव लाख सत्तेचाळीस हजार फक्त) तरतूद वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर तरतूद जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांच्याकडे सूपूर्द करण्यात येत असून याकरिता जिल्हाधिकारी हे नियंत्रक अधिकारी आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

३. सदर निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र तसेच बचत असल्यास त्याबाबतचा अहवाल इ. जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांनी शासनास सादर करावे.

४. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C. च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निदेशानुसार कोणताही शासन निर्णय/अटी व शर्तींचा भंग होणार नाही याची दक्षता जिल्हाधिकाऱ्यांनी यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरीत करण्यापूर्वी जिल्हाधिकारी यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल/वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

५. सदरचा खर्च मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०८) शहरातील अल्पसंख्यांक समाजातील वसतीगृहाकरिता सहायक अनुदान (२२३५ ए १४२), ३१ सहायक अनुदान ( वेतनेतर ) या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.५२/१४७५, दि. ३०.१.२०१५ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.१०२/१५/व्यय-४ दि.९.२.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१२१६४६४१५२१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samir Ramesh Salunkhe

Digitally signed by Samir Ramesh Salunkhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samir Ramesh Salunkhe
Date: 2015.02.13 15:42:51 +05'30'

**( समीर साळुंखे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
२. महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व परीक्षा ) नागपूर
३. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
४. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
५. जिल्हाधिकारी, औरंगाबाद
६. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पांचवा मजला, मुंबई
७. अवर सचिव, का.७, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की त्यांनी उक्त रकमा संबंधिताना कृपया B.D.S. वर उपलब्ध करुन देण्यात याव्यात.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
९. वित्त विभाग (अर्थसंकल्प -४, व्यय -४) मंत्रालय, मुंबई
१०. नियोजन विभाग (कार्या.१४७५)
११. निवड नस्ती, का.८